**अकृषि विद्यापीठे व संलग्नित महाविद्यालयातील कर्मचाऱ्यांच्या पात्र कुटुंबियांना अनुकंपा नियुक्ती देण्यासाठी कमाल वयोमर्यादेचा व टंकलेखन परीक्षा उत्तीर्ण होण्याचा निकष सुधारीत करण्याबाबत....**

**महाराष्ट्र शासन,**
उच्च व तंत्र शिक्षण विभाग,
शासन निर्णय क्र.अकंपा २०११/(३३३/११)-विशि-१,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक १० ऑक्टोबर, २०११.

**वाचा :-** १) शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्र.अकंपा १००४/प्र.क्र.५१/आठ, दि.२२.८.२००५.
२) शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्र.अकंपा १००७/१२९५/प्र.क्र.१८१/आठ, दि.२३.४.२००८.
३) शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्र.अकंपा १०१०/प्र.क्र.३०८/१०/आठ, दि.०६.१२.२०१०.

**प्रस्तावना :-**

शासकीय कर्मचाऱ्यांसाठी असलेल्या प्रचलित अनुकंपा नियुक्ती योजनेमध्ये संदर्भाधीन शासन निर्णय दिनांक २२-८-२००५ व दि.२३-४-२००८ अन्वये अनुकंपा नियुक्तीसाठी कमाल वयोमर्यादा ४० वर्षे इतकी विहित करण्यात आलेली होती. या कमाल वयोमर्यादेच्या अटीमुळे प्रतीक्षासूचीवरील उमेदवारांची नांवे नियुक्ती मिळण्यापूर्वीच वयोधिक्यामुळे वगळली जात असल्याने सदर वयोमर्यादेत वाढ करण्याचा निर्णय सामान्य प्रशासन विभागाने संदर्भाधीन दि.६ डिसेंबर, २०१० रोजीच्या शासन निर्णयान्वये घेतला आहे.

२. सामान्य प्रशासन विभागाचे उक्त दिनांक ६ डिसेंबर, २०१० मधील तरतूदी अकृषि विद्यापीठे व संलग्नित महाविद्यालयांतील शिक्षकेतर अधिकारी / कर्मचाऱ्यांना लागू करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय**

४. सामान्य प्रशासन विभागाच्या क्र.अकंपा १०१०/प्र.क्र.३०८/१०/आठ, दि.६ डिसेंबर, २०१० च्या शासन निर्णयातील सर्व तरतूदी अकृषि विद्यापीठे व संलग्नित महाविद्यालयातील शिक्षकेतर अधिकारी/ कर्मचाऱ्यांना जशाच्या तशा लागू करण्यात येत आहेत..

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक क्रमांक २०१११०१०११२७४२००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(विकास तु. कदम)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

कृ.मा.प.

प्रति,

मा. राज्यपाल तथा कुलपतींचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.

मा. कुलगुरु, सर्व अकृषि विद्यापीठे,

मा. मुख्यमंत्र्यांचे खाजगी सचिव,

मा. उप मुख्यमंत्र्यांचे खाजगी सचिव,

संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे,

कुलसचिव , सर्व अकृषि विद्यापीठे,

सर्व विभागीय शिक्षण सहसंचालक, उच्च शिक्षण,

महालेखापाल-१ (लेखा परिक्षा), महाराष्ट्र , मुंबई,

महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र , मुंबई,

महालेखापाल-२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र , नागपूर,

महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र , नागपूर,

अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई / निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,

सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,

सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय मुंबई,

मा. मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण विभाग यांचे खाजगी सचिव,

मा. राज्यमंत्री, उच्च व तंत्र शिक्षण विभाग यांचे स्वीय सहायक,

उच्च व तंत्र शिक्षण विभागातील सर्व कार्यासने,

निवड नस्ती.